**बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली, ता.जि. चंद्रपूर**
**वेतनाकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१७/प्र.क्र. ९१/फ-९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :-१५ फेब्रुवारी, २०१७

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अंर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. ०१/(१६-१७)/२०९९/२०१६-१७, दिनांक ४.२.२०१७

**प्रस्तावना :-**

राज्य योजनेतंर्गत सन २०१६-१७ मध्ये, चिचपल्ली येथे बांबू प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५०१९२) या योजनेकरिता रू. ५००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक २ च्या पत्रान्वये ४४१५०१९२ या लेखाशिर्षाअंतर्गत बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र चिचपल्ली येथील कर्मचाऱ्यांचे माहे जानेवारी, २०१७ ते मार्च, २०१७ चे वेतन भागविण्याकरीता रू. ३.७५ लक्षचा मंजूरीबाबतचा प्रस्ताव सादर केला असून, सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य योजनेतंर्गत सन २०१६-१७ मध्ये, चिचपल्ली येथे बांबू प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५०१९२) या योजनेकरिता वित्त विभागाच्या दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पित निधीच्या मर्यादेत ४४१५०१९२ या लेखाशिर्षाअंतर्गत बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र चिचपल्ली येथील कर्मचाऱ्यांचे माहे जानेवारी, २०१७ ते मार्च, २०१७ चे वेतन भागविण्याकरीता रू.३.७५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास खालील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
२. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान शिर्ष ४४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजना अंतर्गत योजना, (००४) संशोधन (००) (०२) बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र चिचपल्ली (४४१५ ०१९२) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१६१५२२५१७७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.02.16 15:23:47 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
६. संचालक, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर.
७. उपवनसंरक्षक, चंद्रपूर
८. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
१०.वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
११.नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१२.फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती).